**संजय गांधी निराधार अनुदान योजना व वृध्दशेतमजूरांना अर्थसहाय्य योजना जिल्हा आस्थापना वेतन व वेतनेतर खर्चासाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल व मे, २०१७ करिता अनुदानाचे वाटप.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : बीयुडी-२०११/प्र.क्र.८३७ /विसयो-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १९/०४/२०१७

वाचा :-

१) शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१७/ प्र.क्र.६८ / अर्थसंकल्प-३, दिनांक ०१ एप्रिल,२०१७.

२) शासन ज्ञापन, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: बीजीटी-२०१७ /प्र.क्र. ४८ / अर्थसंकल्प, दि.१३ एप्रिल,२०१७.

**शासन निर्णय** :-

संदर्भाधिन परिपत्रकास अनुसरुन संजय गांधी निराधार अनुदान योजना व इंदिरा गांधी राष्ट्रीय वृध्दापकाळ निवृत्तीवेतन योजना आस्थापनेच्या वेतन व इतर प्रशासकीय खर्चासाठी "महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) विधेयक २०१७" अन्वये मंजूर झालेले माहे एप्रिल व मे , २०१७ या कालावधीसाठी लेखाअनुदान या शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. सर्व विभागीय आयुक्तांना कळविण्यात येते की, त्यांनी यासोबत जोडलेल्या विवरणपत्र- **"अ"** व **"ब"** प्रमाणे वितरीत केलेल्या अनुदानाचे वाटप त्यांच्या अधिपत्याखालील जिल्हयांना आवश्यकतेनुसार करावे व जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्या जिल्हयातील तालुक्यांना आवश्यकतेनुसार वाटप करावे.

३. सदर वितरीत अनुदान प्रपत्र- **"अ"** मध्ये दर्शविल्याप्रमाणे लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावे.

४. सदरहू वितरीत अनुदान प्रपत्र- **"ब"** मध्ये दर्शविल्याप्रमाणे "मागणी क्रमांक एन-२ मुख्य लेखाशीर्ष २०५३, जिल्हा प्रशासन, ०९३-जिल्हा आस्थापना, ०९४-इतर आस्थापना, (०१) इतर आस्थापना, (०१) (०१) वृध्द भूमिहीन शेतमजूरांना अर्थसहाय्य या योजनेवरील आस्थापना खर्च (२०५३ ११७८)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सर्व जिल्हाधिकाऱ्यांनी हा खर्च कोणत्याही परिस्थितीत त्यांच्याकडे सुपूर्द करण्यात आलेल्या अनुदानापेक्षा जास्त होणार नाही याबाबत दक्षता घ्यावी. त्यांच्याकडे सुपूर्द करण्यात आलेल्या अनुदानातून केलेल्या खर्चाचा ताळमेळ महालेखापालांच्या कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी घालून त्याप्रमाणे ताळमेळाचे विवरणपत्र तसेच उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापालांच्या कार्यालयास त्वरित पाठवावीत. तसेच त्याच्या प्रती अनुक्रमे या विभागाचे सहायक संचालक (लेखा व वित्त), लेखा परीक्षण शाखा व कक्ष अधिकारी, विसयो-१ यांना पाठवावी. खर्चाच्या ताळमेळाचे काम व्यवस्थितरित्या पार न पाडल्यास, तसेच उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापालांच्या कार्यालयास विहित वेळेत सादर न केल्यास, त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांच्यावर राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०१७०४१९१५०२०४९७२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ashok Shankar Kamble

Digitally signed by Ashok Shankar Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a46cabe5c0508ff162796cef6812e5a0871884ca74589e042544f55b57006300, cn=Ashok Shankar Kamble
Date: 2017.04.19 15:06:07 +05'30'

**(अशोक कांबळे)**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सर्व विभागीय आयुक्त, पुणे/कोकण/नाशिक/नागपूर/अमरावती व औरंगाबाद
२. सर्व जिल्हाधिकारी.
३. संचालक ,लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, महाराष्ट्र राज्य ,मुंबई
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई (२ प्रती)
५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
६. वित्त विभाग, अर्थसंकल्प ३ ,४, ५ अर्थोपाय व व्यय १४, मंत्रालय, मुंबई
७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
८. उप सचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई४०० ०३२
९. सहायक संचालक (लेखा व वित्त), लेखा परीक्षण शाखा सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१०. कक्ष अधिकारी (विसयो-२), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई४०० ०३२.
११. निवड नस्ती, विसयो-१.

## विवरणपत्र - अ

### सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

शासन निर्णय क्र.बीयुडी-२०११/प्र.क्र. ८३७ /विसयो-१, दिनांक १९ एप्रिल, २०१७ सोबतचे विवरणपत्र.
मागणी क्रमांक-एन-२, मुख्यलेखाशिर्ष-२०५३, जिल्हा प्रशासन ०९३, जिल्हा आस्थापना, (०१) सर्वसाधारण आस्थापना
सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील एप्रिल व मे , २०१७ या महिन्यासांठी अनुदानाचे वितरण

(रुपये हजारात)

| अ.क्र. | विभागीय आयुक्त | संगणक सांकेतांक | ०१-वेतन | ०६-दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क | ११ देशांतर्गत प्रवास खर्च | १३ कार्यालयीन खर्च | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | पुणे | (०१) (०१) (२०५३ १११ ३) | २४३५७.०० | ५८.०० | १३८.०० | ४३६.०० | २४९८९.०० |
| २ | कोकण | (०१) (०२) (२०५३ ११२ २) | २५७३१.०० | ११४.०० | २३६.०० | ४४८.०० | २६५२९.०० |
| ३ | नाशिक | (०१) (०३) (२०५३ ११३ १) | २७०७८.०० | १२०.०० | २४८.०० | ४७०.०० | २७९१६.०० |
| ४ | नागपूर | (०१) (०४) (२०५३ ११४ २) | २४५१३.०० | १४६.०० | ३०२.०० | ५७२.०० | २५५३३.०० |
| ५ | अमरावती | (०१) (०५) (२०५३ ११५ १) | २५७१९.०० | १०४.०० | २७२.०० | ३०४.०० | २६३९९.०० |
| ६ | औरंगाबाद | (०१) (०६) (२०५३ ११६ ९) | १८४५३.०० | १७४.०० | ३६०.०० | ६८४.०० | १९६७१.०० |
|  | एकूण |  | १४५८५१.०० | ७१६.०० | १५५६.०० | १९१४.०० | १५१०३७.०० |

Ashok Shankar Kamble

Digitally signed by Ashok Shankar Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a46cabe5c0508ff162796cef6812e5a0871884ca74589e042544f55b57006300, cn=Ashok Shankar Kamble
Date: 2017.04.19 15:06:42 +05'30'

विवरणपत्र - ब

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१६/प्र.क्र. ७६२ / विसयो-१, दिनांक १९ एप्रिल, २०१७ सोबतचे विवरणपत्र.
मागणी क्रमांक-एन-२, मुख्यलेखाशिर्ष-२०५३, जिल्हा प्रशासन, ०९४ इतर आस्थापना
(०१)(०१) वृध्द भूमिहीन शेतमजूरांना अर्थसहाय्य या योजनेवरील आस्थापना खर्च (२०५३ ११७८)
सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील एप्रिल व मे , २०१७ या महिन्यासांठी अनुदानाचे वाटप.

(रुपये हजारात)

| अ.क्र. | विभागीय आयुक्त | ०१-वेतन | ०६-दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क | ११ देशांतर्गत प्रवास खर्च | १३ कार्यालयीन खर्च | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | पुणे | ९४९६.०० | ३.३० | १९.६० | ४४.०० | ९५६२.९० |
| २ | कोकण | ९४९६.०० | ३.३० | १९.६० | ४४.०० | ९५६२.९० |
| ३ | नाशिक | ९४९६.०० | ३.३० | १९.६० | ४४.०० | ९५६२.९० |
| ४ | नागपूर | ९४९६.०० | ३.३० | १९.६० | ४४.०० | ९५६२.९० |
| ५ | अमरावती | ९५०२.०० | ३.३० | १९.६० | ४४.०० | ९५६८.९० |
| ६ | औरंगाबाद | ९४९६.०० | ३.५० | २०.०० | ४४.०० | ९५६३.५० |
| | एकूण | ५६९८२.०० | २०.०० | ११८.०० | २६४.०० | ५७३८४.०० |

Ashok Shankar Kamble

Digitally signed by Ashok Shankar Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a46cabe5c0508ff162796cef6812e5a08718 84ca74589e042544f55b57006300, cn=Ashok Shankar Kamble
Date: 2017.04.19 15:07:01 +05'30'